**जुन्नर वनविभागातील माणिकडोह बिबट निवारा केंद्रातील पिंजरे बांधकामाचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.डब्ल्युएलपी १०१६/ प्र.क्र.३३३/फ-१**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- २२ डिसेंबर, २०१६.**

**वाचा** :- अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२४(३)/वअ/६५३/सन २०१६-१७ नागपूर. दिनांक २४.१०.२०१६ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

जुन्नर वनविभागातील जुन्नर वनपरिक्षेत्रात सन २००१ पासून बिबट वन्यप्राण्यांचा मानवी वस्तीत सातत्याने प्रवेश होऊन व्यक्ती व पाळीव पशुधन यांचेवरील हल्यांच्या घटनात वाढ झाल्याने मोठया प्रमाणावर बिबटे पिंज-यात बंदिस्त करण्यात आले होते. काही वन्यजीव अपघातग्रस्त, आजारी अथवा वन्यजीवांची अनाथ पिल्ले आढळतात त्यावेळी अशा वन्यजीवांना तात्पुरता आसरा उपलब्ध होणे, त्यांच्यावर वैद्यकीय उपचार करणे, आहार व्यवस्था पाहणे, पुढील निरीक्षणासाठी अशा वन्यजीवांना त्यांच्या नैसर्गिक अधिवासात सोडण्यापूर्वी वन्यजीवांच्या शरिरात सूक्ष्म चीप बसविणे, वन्यजीवांचा अभ्यास करणे इत्यादी कार्य निवारा केंद्रात करण्यात येतात. मूल्यांकन व सनियंत्रण अधिकारी, सेंट्रल झु ॲथोरीटी, नवी दिल्ली ह्यांनीही ह्या संदर्भात दिलेल्या निर्देशाच्या अनुषंगाने जुन्नर वनविभागातील माणिकडोह बिबट निवारा केंद्र येथे ५ बिबटयांसाठी दिवस (Day Cage) रात्र (Night Cage) पिंजरे बांधकामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जुन्नर वनविभागातील माणिकडोह बिबट निवारा केन्द्र येथे ५ बिबटयांसाठी दिवस (Day Cage) रात्र (Night Cage) पिंजरे बांधकामाचे अनुक्रमे रु. ७६.८३ लक्ष व रु. २६.७६ लक्ष असे एकूण रु. १०३.५९ लक्षच्या कामांना खालील अटीस अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविली आहे.

अ) काम सुरू करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रके सार्वजनिक बांधकाम विभागाचे संबंधित अधीक्षक अभियंता यांच्याकडून साक्षांकित करुन घ्यावे.

ब) सदरील कामाची एकत्र निविदा करुन काम हाती घेण्यात यावे.

क) प्रस्तुत काम अर्थसंकल्पाव्यतिरीक्त करावयाचे झाल्यास ४ % सेंटेंज चार्जेस मिळवण्यात यावेत.

सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीच्या अधीन राहून माणिकडोह बिबट निवारा केन्द्रामध्ये ५ बिबटयांसाठी दिवस (Day Cage) रात्र (Night Cage) पिंजरे बांधकाम करणे ह्या कामाच्या रु १,०३,५९,१०१/-(रू. एक कोटी, तीन लक्ष, एकोणसाठ हजार, एकशे एक फक्त) इतक्या रकमेस शासनाची प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) देण्यात येत आहे.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तिय अधिकार, अ.क्र.१ परिच्छेद क्र.१३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२३१५०१०६८९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, serialNumber=2972090f5c611c22111cacebf1c55ba326016fa7107614a6b256203dbb7235cd, cn=Arvind Shankar Apte
Date: 2016.12.23 15:04:42 +05'30'

**(अरविंद आपटे)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग.**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
३. मुख्य वनसंरक्षक (प्रा), पुणे/ मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पुणे.
४. उपवनसंरक्षक (प्रा), जुन्नर वन विभाग, जुन्नर.
५. महालोखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
६. सार्वजनिक बांधकाम विभाग(इमारत-३), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
१०. कार्यासन फ-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२ (निवडनस्ती)